**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्रमांकः कअनि-११२१/प्र.क्र.९१/१४-ब**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
दिनांक : २२ ऑक्टोंबर, २०२१

**आदेश**

श्रीमती सोफिया सोहेल काझी, कक्ष अधिकारी, जलसंपदा विभाग यांच्या सेवा गृहनिर्माण विभागाच्या अधिपत्याखालील महाराष्ट्र गलिच्छ वस्ती (सु.नि.व पु.) न्यायाधिकरण, मुंबई या कार्यालयातील "प्रबंधक" या पदावर प्रतिनियुक्तीने दोन वर्षाच्या कालावधीसाठी सुपूर्द करण्यात येत आहेत.

अ) श्रीमती काझी ज्या तारखेला प्रतिनियुक्तीच्या पदावर रुजू होतील त्या तारखेपासून प्रतिनियुक्तीच्या सेवेचा प्रारंभ होईल त्यानंतर दोन वर्षांनी प्रतिनियुक्तीच्या पदाचा कार्यभार सुपूर्द करुन, त्यांच्या मूळ विभागात, ज्या तारखेला रुजू होतील त्या तारखेला त्यांचा प्रतिनियुक्तीचा कालावधी समाप्त होईल.

ब) जर त्यांची सेवा लोकसेवेच्या हिताच्या दृष्टीने शासनाला आवश्यक वाटली तर प्रतिनियुक्तीचा कालावधी संपण्यापूर्वी कोणत्याही वेळी त्याला परत बोलावून घेण्याचा अधिकार शासन/सक्षम प्राधिकारी राखून ठेवील.

क) जर त्यांची सेवा स्वीयेत्तर नियोक्त्याला आवश्यक वाटली नाही तर त्यांना मूळ विभागाकडे परत पाठवण्याची मुभा स्वीयेत्तर नियोक्त्याला राहील. मात्र याप्रमाणे परत पाठवण्यापूर्वी स्वीयेत्तर नियोक्त्याने शासनाला/ सक्षम प्राधिकाऱ्याला तीन महिन्यांची नोटीस दिली पाहिजे; आणि

ड) त्यांनी मूळ विभागाकडे परत जाण्याचा आपला उद्देश आहे अशी कमीत कमी तीन महिन्यांची लेखी नोटीस शासनाला/ सक्षम प्राधिकाऱ्याला दिल्यानंतर त्यांना मूळ विभागाकडे परत येण्याची मुभा राहील.

२. म.ना.से.(पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा ..इ) नियम १९८१ मधील नियम ४० (परिशिष्ट - दोन) मधील तरतुदी विचारात घेऊन गृहनिर्माण विभाग व जलसंपदा विभाग यांनी प्रतिनियुक्तीबाबतच्या अटी व शर्ती ठरवाव्यात.

३. श्रीमती काझी यांच्या इतर सर्व प्रशासकीय बाबी गृहनिर्माण विभाग व जलसंपदा विभाग यांचेमार्फत हाताळण्यात येतील.

४. श्रीमती काझी यांना जलसंपदा विभागाने कार्यमुक्त करावे.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११०२२१७४३५२३१०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Gajanan Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a8021798a5c1ed41ada8a72725a47b4f0, serialNumber=54b11b1ccbdc577d71dce3b313c3fef5dc2ad659e360f73b682d6b6fccb8aecf, cn=Gajanan Bhimrao Gurav
Date: 2021.10.22 17:46:00 +05'30'

**(ग.भि.गुरव)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

श्रीमती सोफिया सोहेल काझी, कक्ष अधिकारी, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

**प्रत,**

१) अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव /सचिव, गृहनिर्माण विभाग/ जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

२) सह/ उप सचिव (आस्थापना), जलसंपदा विभाग , मंत्रालय, मुंबई -३२.

त्यांना विनंती करण्यात येते की, प्रतिनियुक्तीच्या अटी व शर्ती नमूद केलेल्या आदेशाची एक प्रत या कार्यासनाकडे पाठविण्यात यावी.

३) उप सचिव, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

४) निवड नस्ती / संग्रहार्थ.